यंत्रमागधारकाना विद्युत दरात देण्यात
सवलतीपोटी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.
मे.लोटस इंडस्ट्रीज, सांताक्रुझ, मुंबई

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. टॅरिफ-२०१५/प्र.क्र.४७/ऊर्जा-३,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- २५ मे, २०१५**

**संदर्भ**:- १. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टेरीफ-२००८/प्र.क्र.१४/ऊर्जा-३ दि. २६/०२/२००८
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टेरीफ-२००८/प्र.क्र.१४१/ऊर्जा-३ दिनांक ३१/०१/२००९
३. मुख्य अभियंता (विद्युत) यांचे पत्र क्र.का-५(७)/१२४४/सन २०१५, दि.३०/०३/२०१५
४. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/०४/२०१५

**प्रस्तावना :-**

शासनाच्या प्रचलित धोरणानुसार राज्यातील यंत्रमागधारकांना शासनामार्फत वीजेच्या दरात सवलत देण्यात येते. या सवलतीपोटी देय असलेली रक्कम संबधित अनुज्ञप्ती धारकांमार्फत यंत्रमाग धारकांना परत केली जाते. शासनाच्या सदर धोरणानुसार मे. रिलायन्स इन्फ्रास्ट्रक्चर लि. मुंबईचे कंपनीच्या कार्यकक्षेत कार्यरत असलेल्या मे.लोटस इंडस्ट्रीज, सांताक्रुझ, मुंबई. यांना दिनांक ०१/१०/२०१२ ते ३१/११/२०१३ या कालावधीत विद्युत दरात दिलेली सवलतीची रक्कम रु.१६,९७,७४९/- (रुपये सोळा लाख सत्त्याण्णव हजार सातशे एकोणपन्नास फक्त) परत देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मे. रिलायन्स इन्फ्रास्ट्रक्चर कंपनी लिमिटेड, मुंबई यांचे वीज ग्राहक असलेले मे.लोटस इंडस्ट्रीज, सांताक्रुझ, मुंबई. या यंत्रमागधारक ग्राहकास (ग्राहक क्र. १०२६९७२९५) माहे दिनांक ०१/१०/२०१२ ते ३१/११/२०१३ या कालावधीत विद्युत दरात दिलेली सवलतीची रक्कम रु.१६,९७,७४९/- (रुपये सोळा लाख सत्त्याण्णव हजार सातशे एकोनपनास फक्त) इतकी रक्कम परत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम मे. रिलायन्स इन्फ्रास्ट्रक्चर लि. मुंबईचे कंपनी यांचेमार्फत यंत्रमागधारकाला वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्क्म ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबीचा खर्च "मागणी क्र. के-६, वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००),(००)(०१) कृषिविषयक व यंत्रमागविषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण/पारेषण परवानाधारकाना अर्थसहाय्य (योजनेतर)(२८०१२६१५) ३३ अर्थसहाय्य" या खाली खर्ची टाकावा व तो सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून मे.लोटस इंडस्ट्रीज, सांताक्रुझ, मुंबई, यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.

राजुरकर, अवर सचिव आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ब.शे.मांडवे, उप सचिव यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी रक्कम रु.१६,९७,७४९/- (रुपये सोळा लाख सत्त्याण्णव हजार सातशे एकोनपनास फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन **मे. रिलायन्स इन्फ्रास्ट्रक्चर लि. मुंबई.** यांचे नावे स्वतंत्ररीत्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम वित्त्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या कॅश फलोच्या (मासिक वितरण) मर्यादेत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ- क्र.१०७/१५/व्यय-१६, दि.०७/०५/२०१५ तसेच शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/०४/२०१५ च्या परिपत्रकानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत सथळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०५२५१८३०५१८३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: CN = Vilas M Rajurkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.25 18:31:48 +05'30'

**(वि.म. राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत :**

१. व्यवस्थापकीय संचालक, मे. रिलायन्स इन्फ्रास्ट्रक्चर लि. देविदास लेन ,एसव्हीपी रोडच्या बाजुला देविदास टेलिफोन एक्सचेंज,बोरीवली (पश्चिम), मुंबई४००१०३.
२. मे.लोटस इंडस्ट्रीज,व्हिला,वेस्ट ॲव्हेन्यू रोड विजय बँक फॉरेन एक्सचेंज डिपार्टमेंट,सांताक्रुझ (पश्चिम), मुंबई- ४०००५४
३. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, ३ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४००००१.
४. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबुर (पूर्व), मुंबई-४०००७१.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
६. महालेखापाल (लेखा व परिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१०.अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११.कक्ष अधिकारी (प्रशासन-१),उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२.वित्त विभाग/(अर्थसंकल्प-३/साधनसंपत्ती/साऊ/व्यय-१६), त्रालय, मुंबई- ४०००३२.
१३.निवडनस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२.